


जनहिताय सर्वदा



**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID :dokh.rfd@maharashtra.gov.in

---

**क्रमांक: गौखनि-३५/०१२१/प्र.क्र.०५/ख-१** दिनांक:-१३ मार्च,२०२४

**विषय:- गौण खनिज- सातारा**
**सन २०१५-१६ करीता मौजे खुबी, ता. कराड, जि. सातारा येथील गट क्र.१६ ते २२, २ ते १५, ४२३,४२४ या वाळू गटामधून उत्खनन करता न आलेल्या वाळूचा परतावा मिळणेबाबत**
**निनाई कन्स्ट्रक्शन तर्फे श्री. महादेव हणमंत पाटील.**

**शासन ज्ञापन :-**

सन २०१५-१६ करीता रोजी मौजे खुबी, ता. कराड, जि. सातारा येथील गट क्र.१६ ते २२, २ ते १५, ४२३,४२४ हा वाळूगट ६७४० ब्रास करीता रक्कम रुपये ३,५०,५०,०००/- एवढ्या सर्वोच्च बोलीस अपर जिल्हाधिकारी, सातारा यांनी दिनांक २५.०१.२०१६ च्या आदेशान्वये निनाई कन्स्ट्रक्शन तर्फे श्री. महादेव हणमंत पाटील यांना मंजूर केला होता.

०२. उक्त वाळू गटामधून ग्रामस्थांच्या विरोधामुळे उत्खनन करता न आलेल्या वाळूचा परतावा मिळण्याची लिलावधारक यांनी केली होती. लिलावधारकास सदर वाळूगटातून वाळू उत्खननास ग्रामस्थांच्या विरोधाबाबत शासन निर्णय, दिनांक १२.०३.२०१३ मधील परिच्छेद-१४ (क) नुसार जिल्हास्तरीय तक्रार निवारण समितीमार्फत कोणताही निर्णय घेतल्याचे दिसून येत नसल्याने लिलावधारक यांची परताव्याची विनंती शासन पत्र दिनांक १४.०६.२०२१ अन्वये अमान्य केली होती.

०३. शासन पत्र दिनांक १४.०६.२०२१ अन्वये व्यथित होऊन लिलावधारक यांनी मा. मंत्री (महसूल) यांचेकडे अपील दाखल केले.प्रकरणी मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक २५/१०/२०२१ रोजीच्या आदेशान्वये शासन पत्र दिनांक १४/०६/२०२१ रोजीचे आदेश रद्द करुन अर्जदार यांना उत्खनन करण्यास शिल्लक परिमाणापोटी प्रमाणशिर परताव्याची रककम परिगणित करुन अर्जदार यांना अदा करण्याचे आदेश दिले आहेत.

०४. तत्कालिन मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक २५/१०/२०२१ रोजी दिलेले आदेश त्यानुषंगाने जिल्हाधिकारी सातारा यांनी सादर केलेला अहवाल व जिल्हास्तरीय सनियंत्रण समितीचा निर्णय या बाबी विचारात घेता, सन २०१५-१६ करीता मौजे खुबी, ता. कराड, जि. सातारा येथील गट क्र.१६ ते २२, २ ते १५, ४२३,४२४ या वाळूगटामधून ग्रामस्थांच्या विरोधामुळे लिलावधारक यांना उत्खनन करता न आलेल्या वाळूच्या परिमाणापोटी लिलावधारक यांना रु.१,७१,६४,७००/- (एक कोटी एकाहत्तर लाख चौशष्ठ हजार सातशे मात्र) एवढ्या रक्कमेचा परतावा अदा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०५. वाळू/रेती निर्गती धोरण, शासन निर्णय दि.१२.०३.२०१३ मधील तरतुदीनुसार उक्त वाळू गटाच्या लिलाव दिनांक २०.११.२०१५ रोजी आयोजित करण्यात आला होता. सदर धोरणातील लिलावधारकाशी करावयाच्या अटी व शर्ती मधील अटीनुसारनुसार लिलावधारक यांनी लिलवाची १/४ रक्कम लिलावाच्या दुस-या दिवशी व ३/४ रक्कम त्यानंतर १५ दिवसात म्हणजेच दिनांक ०७.१२.२०१५ पूर्वी शासनास भरणा करणे आवश्यक होते. तथापि, लिलावधारक यांनी लिलावाची उर्वरित १/४ रक्कम व ३/४ दि.०६.०१.२०१६ रोजी

शासन जमा केली आहे.सबब, सदर धोरणातील तरतुदीनुसार रक्कमेचा भरणा विहित वेळेत न केल्यामुळे लिलावधारक यांची १/४ रक्कम रुपये ८७,६२,५००/- जप्त करण्यात आली आहे.

**०६.** सबब, लिलावधारक निनाई कन्स्ट्रक्शन तर्फे श्री. महादेव हणमंत पाटील यांनी लिलावाची संपुर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन करता न आलेल्या वाळूचा प्रमाणशिर परतावा रु.१,७१,६४,७००/- (एक कोटी एकाहत्तर लाख चौशष्ठ हजार सातशे मात्र) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०७.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२- खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०८. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३१४/२०२३/व्यय-९ दि.१६.१०.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१५५३५१४२१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.03.13 16:03:03 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, सातारा**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१),
७) निवडनस्ती